१) भगवान श्री गणेशांची अत्यंत प्रिय तिथी - चतुर्थी. गाणपत्य सांप्रदायी करीता, श्रीगणेशोपासकांकरिता सर्वोत्तम व्रतराज म्हणजे चतुर्थी.

श्री चतुर्थी महात्म्य!
भगवान श्री गणराज प्रभूंची प्राणप्रिय तिथी आहे चतुर्थी. अगदी आबालवृद्ध सगळ्यांनाच हे ज्ञात आहे की मोरयाची आवडती तिथी आहे चतुर्थी. पण प्रश्न आहे की काय आहे नेमकी ही चतुर्थी ? केवळ पंचांगातील चवथा दिवस इतकाच अर्थ असेल का? जर तेवढाच अर्थ असेल तर ज्या सगळ्याच काळाला भगवंतानीच घडविले त्यातील एखादाच दिवस त्यांना वेगळा प्रिय कसा असेल? मग काय आहे चतुर्थी?

चतुर्थी विज्ञान हा अध्यात्म शास्त्राचा विचार आहे आणि अध्यात्माच्या दृष्टीने ती चवथी अवस्था आहे कोणती चवथी अवस्था ? तर तीनच्या पार ती चवथी. तीन हा अंक उच्चारला की आध्यात्मिक शास्त्रातील तीनचे विविध संदर्भ सहजच नजरे समोर तरळतात. तीन म्हटले की त्रिगुण, तीन म्हटले की त्रिकाळ, तीन म्हटले की त्रीदेह .

सत्व, रज, तम, या तीन गुणांच्या पलीकडची ती चतुर्थी, भूत, वर्तमान, भविष्य या तीनच्या अतीत ती चतुर्थी. स्थुल, सूक्ष्म, कारण देहाच्या पार ती चतुर्थी.

मात्र या तीनही कथनात एक अडचण आहे. सत्व, रज, तम हे तीनच गुण आहेत. यांच्या पार म्हटले की फारतर निर्गुण म्हणता येते. कालही तीनच आहेत त्यांच्या पलीकडे म्हणतांना फक्त कालातीत असेच म्हणावे लागते. देहत्रयातीत मध्येही अशीच अडचण आहे. कारण चवथा गुण, चवथा काळ, चवथा देह अस्तित्वाचा नाही. मग चतुर्थी ही अभावात्मक आहे का? तर मुळीच नाही.
याच कारणाने श्रीगणेश अथर्वशीर्षात एक चवथा पाठ आहे. हा चवथा पाठच चतुर्थीचे रहस्य आहे. कोणता आहे तो पाठ?

आरंभीचे तीन कथने आहेत-
त्वं गुणत्रयातीत:
त्वं देहत्रयातीत:
त्वं कालत्रयातीत:!

पण या तीन मध्येही चवथी रचना नाही आहे ती गुणत्रया शिवाय अशी निषेध परच. पण चवथा पाठ आहे त्वं अवस्थात्रयातीत:! हे गणराजा तू तीन अवस्थांच्या पार आहेस आणि महत्वाचे म्हणजे ही चवथी अवस्था अभावात्मक नाही. निषेधपर नाही. तर ती अस्तित्वपर आहे.

शास्त्र चार अवस्थांचा विचार मांडते जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती अशा तीन अवस्था आहेत. या तीन अवस्थांच्या पार आहे आपला मोरया. ही चवथी अवस्था आहे "तुरीयावस्था". ही चवथी अवस्था आहे मोरयाची प्रिय अवस्था. तिला म्हणतात चतुर्थी.

आधीच्या तीनही अवस्थांमध्ये पहा कशी अडचण आहे. जागृती आणि स्वप्नात आपणास ज्ञान आहे पण ते ज्ञान सत्य नाही, भासमान आहे सुषुप्तीत (गाढ निद्रावस्था) लोपले आहेत. पण तेथे भानही लोपले आहे. ज्ञान आहे तर भान नाही आणि भान आहे तर ज्ञान नाही अशी ही अडचण आहे. मात्र चवथी अवस्था या अडचणीवरील मात आहे.

या अवस्थेत जागृतीतील भानही आहे आणि सुषुप्तीतील ज्ञानही आहे. जागृतीतील भानासह सुषुप्तीचे ज्ञान वा सूषुप्तीच्या ज्ञानावर अधिष्ठित जागृती मधील भान म्हणजे "तुरीयावस्था".
येथे जागृतीतील सुस्पष्ट दर्शन आहे आणि त्याच वेळी या दर्शनातील नश्वरतेचे ज्ञानही प्रगट आहे. सामान्य माणूस जागृत, स्वप्नस्थ गोष्टीत रमतो. यातील प्राप्तीलाच सत्य मानत राहतो. मात्र स्वप्नातील प्राप्ती प्रमाणेच जागृतीतील प्राप्तीही नश्वर आहे. या नश्वरनिष्ठेतेचा त्याग करीत ईश्वरनिष्ठ होण्याच्या प्रयासाचे नाव आहे चतुर्थी.

चतुर्थी करणे याचा अर्थच आहे ही अवस्था मिळवणे. किमान त्यासाठी प्रयास करीत राहणे. एका मोरया शिवाय अन्य सर्व नश्वर आहे, ह्या ठाम जाणीवेच्या प्रगटीकरणाचा प्रयास आहे चतुर्थी, म्हणूनच श्रीगणेशांची ही प्राणप्रिय तिथी अन्य कोणत्याही शुभकार्यास त्याज्य मानली आहे. लोक प्रश्न करतात की मोरयाची एवढी प्रिय तिथी मग लग्न, मौज, गृहप्रवेश, नवीनखरेदी, बांधकाम इ. सगळ्यांसाठी ही तिथी 'वर्ज्य कां? त्याज्य कां? तर प्रश्न तिथीचा नाही या पदार्थाच्या प्राप्तीच्या त्याज्यतेचा आहे, मोरया समोर हे सर्व त्याज्य आहे हे त्यातून अधोरेखित करायचे आहे. त्रिगुण, त्रिकाल, त्रिदेह हे त्यागल्यावरच ती तुरीयावस्था साधणार आहे. किमान या त्यागाचा संकल्प, तशी मनीषा जागवणे म्हणजे "चतुर्थी करणे" त्याचा आपण करतो तसा केवळ "खाद्यपदार्थ बदल" इतका सामान्य अर्थ नाही. खाद्य बंदीचा भाग केवळ इतकाच असतो की ज्या अन्नामुळे हा देह चालतो असे आपल्याला बाह्यत: वाटते त्या भ्रांतीला सोडून ज्याच्या सत्तेवर तो देह चालतो त्या गणराज प्रभुंचेच अखंड चिंतन करणे. अन्नाद्वारे हा चालतो या भ्रांतीला सोडणे म्हणजे भोजन त्यागणे हे होणार नसेल आणि आठवण जेवणाचीच जागृत असेल तर उपवास म्हणायचे तरी कसे?

अन्न सुध्दा ब्रम्हच आहे. पण या अन्न ब्रम्हाच्या पार जात ब्रह्मणस्पती चिंतनाचा काळ म्हणजे चतुर्थी.

अन्नानेही तृप्ती लाभतेच, नाही असे नाही पण ती चिरंतन नसते. चार पाच तासात पुन्हा भूक पेटतेच. जगातील सगळ्याच बाह्यपदार्थांगत तृप्तीचे असेच असते. पद, पैसा, प्रतिष्ठा, पुरस्कार या सगळ्याबाबी आनंद देतातच. पण तो शाश्वत नाही. चिरंतन नाही. कारण त्या बाबीच चिरंतन नाहीत मग त्यापासून मिळणारा आनंद चिरंतन कसा असेल? याचे चिंतन आहे चतुर्थी.

या नश्वरतेच्या त्यागाने ईश्वरशरणतेला मजबूत करण्याचा प्रयास आहे चतुर्थी.

चतुर्थीचा हा खरा आध्यात्मिक अर्थ आहे. बाकी कथा या मूलार्थाला प्रगट करण्याकरीता प्रतिकात्मक रुपात केलेले वर्णन असते. ते केवळ वरपांगी पाहून चालत नाही. नाही तर चार हात. चार पाय, चार मस्तक अशी कुठे कोणी स्त्री असते तरी कां? पण तरी हे वर्णन पुराणकर करतात. काय प्रतीकात्मक अर्थ असेल त्या वर्णनाचा? आगामी लेखात या चतुर्थीच्या स्वरूपाचा विचार करू.
जय गणेश!